__तात्काळ / कालमर्यादा__

**सन २०१६-१७ मधील निधी वितरण / पुनर्विनियोजन प्रस्ताव.......**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : २४ मार्च, २०१७.**

__पहा__ :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक पूरक-२०१६/प्र.क्र.१२८/अर्थ-३, दि. १२ ऑगस्ट, २०१६.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक पूरक-२०१६/प्र.क्र.२०१/अर्थ-३, दि. ४ जानेवरी, २०१७.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. ८ फेब्रुवारी, २०१७.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक बीजीएम-२०१६/प्र.क्र.१२/अर्थ-२, दि. ७ मार्च, २०१७.
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक पुरक-२०१७/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. २३ मार्च, २०१७.

__परिपत्रक__

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदी (पुरक मागण्यांसह) वितरणासंदर्भात सर्व संबंधित प्रशासकीय विभागांना संदर्भाधीन परिपत्रकाद्वारे सूचना देण्यात आलेल्या आहेत.

२. सदर सूचनांच्या अनुषंगाने सर्व मंत्रालयीन विभागांना असे कळविण्यात येते की, सन २०१६-१७ च्या सुधारीत अंदाजाच्या मर्यादेतच संदर्भाधीन परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या सूचनेनुसार निधीचे वितरण करण्यात येईल, याबाबत प्रशासकीय विभागाने दक्षता घ्यावी. तसेच मार्च-२०१७ च्या पुरक मागण्यांचा निधी जर काही अटी व शर्तीच्या अधिनतेने अर्थसंकल्पीत करण्यात आला असेल तर त्या अटींची पुर्तता करुन तेवढयाच नस्त्या वरील अनुक्रमांक ६ नुसार वित्त विभागाला सादर कराव्यात.

३ सुधारीत अंदाज अंतिम झाले असल्याने व एखादया योजनेचा निधी कमी पडत असल्यास व इतरत्र बचत असल्यास तेवढयाच निधीचे पुनर्विनियोजन करावयाच्या नस्त्या वित्त विभागाला सादर कराव्यात. हे पुनर्विनियोजन सरसकट न करता अपवादात्मक व टाळता न येण्यासारख्या बाबी असल्यासच प्रस्तावित करावे.

४ निधी वितरण तसेच पुनर्विनियोजनाबाबतच्या नस्त्या आवश्यक तेथे नियोजन विभाग / सामाजिक न्याय विभाग / आदिवासी विकास विभाग या विभागांच्या मान्यतेनंतर वित्त विभागास __**बुधवार दि. २९ मार्च, २०१७ रोजी दुपारी १२.०० वाजेपर्यंत**__ स्विकारण्यात येतील,

याची विभागाने नोंद घ्यावी. तसेच अशा नस्त्यांच्या निर्देशपत्रावरच **"सन २०१६-१७ निधी वितरण / पुनर्विनियोजन"** **असे ठळक मोठ्या अक्षरात नमूद करावे**. यानंतर अशा बाबींचे प्रस्ताव / नस्ती वित्त विभागात कोणत्याही परिस्थितीत स्विकारले जाणार नाहीत, याची कृपया नोंद घेऊन त्यानुषंगाने कार्यवाही करण्यात यावी. तसेच वित्त विभागाच्या नोंदणी शाखेमध्ये प्राप्त झालेले असे प्रस्ताव नोंदणी शाखेने तातडीने संबंधित व्यय शाखेकडे पाठवावेत. व्यय शाखेने सदर प्रस्तावाची छाननी करुन अभिप्रायासह असे प्रस्ताव दि. ३० मार्च, २०१७ रोजी दुपारी १२.०० वाजेपर्यंत अर्थसंकल्प शाखेस पाठवावेत.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०३२४१८०३१३२२०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant K. Patil

Digitally signed by Vasant K. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=FINANCE DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16a60323ef3beff915e7cf13b9836a7df2ad6df610965aab153a71bdb81c36c1, cn=Vasant K. Patil
Date: 2017.03.24 18:04:20 +05'30'

(व. कृ. पाटील)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (व्हीएलसी शाखा) महाराष्ट्र, मुंबई
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)(व्हीएलसी शाखा) महाराष्ट्र, नागपूर
६) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
७) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, नागपूर
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती, अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.